ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या त्रयस्थ<br>तांत्रिक परिक्षणासाठी मार्गदर्शक सूचना.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.६१/पापु-०७**
७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, मंत्रालय,
मुंबई-४०० ००१
तारीख: १५ जून, २०१५

**वाचा :**

१) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक ९ जुलै,२०१४
२) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४(अ)/पापु-०७, दिनांक १७ मार्च,२०१०

**प्रस्तावना :**

ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता क्षेत्रात सुधारणा तसेच विकेंद्रीकरण घडवून आणण्यात महाराष्ट्र राज्य देशात अग्रेसर आहे. राज्याच्या ११२.४ दशलक्ष लोकसंख्येपैकी ६१.८ दशलक्ष (सुमारे ५५%) लोकसंख्या ग्रामीण भागात राहते. राज्याचा लोकसंख्येच्या दृष्टिने देशात दुसरा तर क्षेत्रफ़ळाच्या बाबतीत तिसरा क्रमांक लागतो. राज्यात ३३ जिल्हे असून त्यामध्ये २८,८१३ ग्रामपंचायतीचा व सुमारे ९८,८४२ वस्त्यांचा समावेश होतो.

राज्य शासनाच्या पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामार्फत पाणी पुरवठा व स्वच्छता विषयक बाबींसंबंधी धोरणे ठरविणे, कार्यक्रमाची अंमलबजावणी व देखरेख या बाबी प्रामुख्याने हाताळल्या जातात. जिल्हा पातळीवर जिल्हा परिषदा व गाव पातळीवर ग्राम पंचायती ह्या कार्यक्रमाची अंमलबजावणी करणाऱ्या प्रमुख संस्था आहेत. महाराष्ट्र जीवन प्राधिकरण आणि भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा या राज्य स्तरावरील तांत्रिक संस्थामार्फत तांत्रिक तज्ञ/कर्मचारी (जिल्हा परिषदावर प्रतिनियुक्तीने), तसेच गरजेनुसार तांत्रिक सहाय्य पुरविले जाते. क्षेत्रिय/प्रादेशिक स्तरावरील वेगवेगळ्या संस्थामध्ये त्यांची भूमिका आणि जबाबदाऱ्या यांची व्यवस्थित मांडणी करण्यात आलेली असली तरी आजही त्यांच्यामार्फत राबविण्यात येणाऱ्या कार्यक्रमाच्या नियोजन, अंमलबजावणी व देखरेख यामध्ये समन्वयाचा अभाव आहे.

संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी तांत्रिक मान्यता, प्रशासकीय मान्यता, अंमलबजावणी, त्रयस्थ तांत्रिक परीक्षण व देखभाल दुरुस्तीबाबत सुधारित

मार्गदर्शक सुचना पारित करण्यात आल्या आहेत. याच शासन निर्णयान्वये ग्रामीण पाणी पुरवठा योजनांचे त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करणे बंधनकारक करण्यात आले असून, त्रयस्थ तांत्रिक परीक्षणाची सविस्तर कार्यपद्धती व त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करण्यासाठी निश्चित करावयाच्या संस्था/ यंत्रणा याबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्याचे नमूद केले आहे.

वरील बाबींचा विचार करून, केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमामार्फत महाराष्ट्र शासनाला ग्रामीण पाणीपुरवठा कार्यक्रमास सहाय्य करण्यासाठी निधी प्राप्त होत असल्याने कार्यक्रमातंर्गत करण्यात येणाऱ्या पाणी पुरवठ्याच्या कामांची स्वतंत्रपणे पडताळणी (त्रयस्थ तांत्रिक परीक्षण) करणे आवश्यक असल्याची विचारधारा शासनाच्या समोर आली आहे. यास्तव ग्रामीण पाणी पुरवठा योजनांचे त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करण्यासाठी खालीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना पारित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

## शासन निर्णय :

प्रस्तावनेत नमुद केलेली वस्तुस्थिती विचारात घेवून ग्रामीण पाणी पुरवठा योजनांचे त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करणे बंधनकारक करण्यात येत आहे. जिल्ह्यातील सर्व ग्रामीण पाणी पुरवठा योजनांचे त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करुन घेण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांची राहील. जिल्ह्यातील ग्रामीण पाणी पुरवठा योजनांचे प्रभावी त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करण्यासाठी पुढीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहेत.

### १. ग्रामीण पाणी पुरवठा योजनांचे त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करण्याची आवश्यकता :

१. केंद्र शासन पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम हा राज्यात उल्लेखनीयरित्या पार पाडण्यात येत आहे. या कार्यक्रमामुळे विकेंद्रीकरणास तसेच मागणी-पुरवठा पध्दतीच्या बळकटीकरणास चालना मिळाली असली तरी आजही सेवा पुरविण्यात राज्यासमोर लक्षणीय आव्हाने निर्माण झाली आहेत.

२. महाराष्ट्र शासनाने मागील काळात पाणी पुरवठा या क्षेत्रात केलेल्या गुंतवणुकीमुळे राज्यातील ९८,००० पेक्षा जास्त वाड्या/वस्त्या/गावांना पिण्याचे पाणी उपलब्ध करुन देणे शक्य झाले आहे. असे असले तरीही राज्यभरात सरासरी ३० टक्केपेक्षा कमी घरगुती नळ जोडणीद्वारे पुरविण्यात येणाऱ्या पाणी पुरवठा सेवेची गुणवत्ता ही हलक्या प्रतीची राहिलेली आहे.

३. तसेच अधुनमधून पाणी पुरवठा, कमी दाब, पाणी गुणवत्ता यासारख्या समस्यांना शासनास सामोरे जावे लागत आहे. याशिवाय वातावरणातील बदलाचा पर्जन्याच्या वितरणावर तसेच पाण्याच्या उपलब्ध स्रोतांवर होणारा परिणाम यासारख्या समस्यांनाही सामोरे जावे लागत आहे.

४. राज्यातील ग्रामीण भागातील वाड्या/वस्त्यांना पुरविण्यात येणाऱ्या पाणी पुरवठा सेवेचा दर्जा सुधारावा याकरिता प्रत्येक वर्षी नवीन योजना राबविण्यासाठी तसेच जुन्या योजनांची क्षमता वाढविण्यासाठी त्रयस्थ तांत्रिक परीक्षणाची नितांत आवश्यकता असल्याचे शासनाच्या निदर्शनास येत आहे.

५. महाराष्ट्र हे झपाट्याने शहरीकरण होणारे राज्य असून राज्यातील बरीचशी मोठी गावे (१०,००० पेक्षा जास्त लोकसंख्येची) तसेच नव्याने निर्माण होणारी निम-शहरी गावे ही उच्च प्रतीच्या पाणी पुरवठा सेवेची मागणी करीत आहेत.

## २. ग्रामीण पाणी पुरवठा योजनांचे त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करण्याचा उद्देश :

१. या कार्यक्रमाचा उद्देश राज्यातील ग्रामीण पाणीपुरवठा व स्वच्छता कार्यक्रमाचे नियोजन, अंमलबजावणी व संनियत्रण करणाऱ्या प्रादेशिक यंत्रणांची कार्यक्षमता वाढविणे.

२. ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या कामाचा दर्जा उंचावणे व पाण्याची गुणवत्ता वाढविणे.

३. पाणी गुणवत्ता बाधित व टंचाईग्रस्त भागामध्ये गुणवत्तापुर्ण आणि शाश्वत पाणी पुरवठ्याच्या सोयी/सुविधा उपलब्ध करुन देण्यावर भर देणे.

४. घरगुती नळजोडणीची संख्या वाढविणे.

५. पुरेसा दाब व किमान गुणवत्तेसह शाश्वत पाणी पुरवठ्याची हमी देणे.

६. वाढत्या दुष्काळात पिण्याची पाण्याची हमी देणे.

## ३. ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या त्रयस्थ तांत्रिक परीक्षणाची कार्यपध्दती :

१. ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या प्रगतीचे त्रयस्थ तांत्रिक परीक्षण किमान २ वेळा करण्यात यावे. (योजनेचे २० ते ३० टक्के काम पुर्ण झाल्यानंतर व ६० ते ७० टक्के काम पुर्ण झाल्यानंतर) तथापि, अंमलबजावणी यंत्रणा यापेक्षा अधिक वेळा योजनेचे त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करुन घेवू शकतात.

२. ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या अंमलबजावणीची वाटचाल/प्रगती जाणून घेण्यासाठी व योजनेच्या प्रगतीचा आढावा घेण्यासाठी (परिणामांचे मोजमाप करण्यासाठी) त्रयस्थ तांत्रिक यंत्रणांनी उद्दिष्टपुर्ती निर्देशक (Success Indicators) ठरवावेत.

३. उद्दिष्टपुर्ती निर्देशक हे दोन प्रकारचे असावेत. अ) निधी वितरणाशी संबंधीत असतील ते "निधी आधारित उद्दिष्टपुर्ती निर्देशक" म्हणून ओळखले जावेत, ब) निधी वितरणाशी संबंधीत नसलेले "इतर उद्दिष्टपुर्ती निर्देशक" म्हणून ओळखले जावेत.

## ४. ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या त्रयस्थ तांत्रिक परीक्षणासाठी स्वतंत्र पडताळणी यंत्रणा नेमणे :

१. राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमातंर्गत राबविण्यात येणाऱ्या ग्रामीण पाणी पुरवठा योजनेच्या कामांची गुणवत्ता स्वतंत्रपणे तपासण्यासाठी तसेच त्यांचे त्रयस्थ तांत्रिक परीक्षण

करण्यासाठी शासकीय अभियांत्रिकी (पदवी/पदविका) महाविद्यालयांच्या, शासकीय आय आय टी (IIT) संस्थांच्या, महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे गुणवत्ता व सनियंत्रण पथक, पाणी पुरवठा क्षेत्राशी निगडीत अन्य शासकीय संस्था यांच्या सेवा घेण्यात याव्यात.

२. जिल्ह्यातील ग्रामीण पाणी पुरवठा योजनांचे त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करण्यासाठी अंमलबजावणी यंत्रणांनी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या मान्यतेने शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये (पदवी/पदविका) तसेच शासकीय आय. आय. टी. (IIT) संस्था, महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे गुणवत्ता व सनियंत्रण पथक, पाणी पुरवठा क्षेत्राशी निगडीत अन्य शासकीय संस्था यापैकी एका संस्थेची निवड करावी. या निवडीमध्ये कोणतीही खाजगी संस्था सहभागी असणार नाही याची दक्षता मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी घ्यावी.

**५. त्रयस्थ तांत्रिक परीक्षणासाठी नेमलेल्या/नेमावयाच्या स्वतंत्र पडताळणी यंत्रणांची कर्तव्ये:**

१. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या आदेशानुसार ग्रामीण पाणी पुरवठा योजनांचे त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करावे.

२. ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी नेमून दिलेल्या उद्दिष्टांची स्वतंत्रपणे पडताळणी करणे व त्याबाबतचा अहवाल मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना व आवश्यकतेप्रमाणे शासनास (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग) सादर करावा.

३. साध्य केलेल्या उद्दिष्टपुर्ती निर्देशकांची अचुकता आणि गुणवत्ता, कागदोपत्री तसेच भौतिकदृष्ट्या नियमितपणे तपासावी.

**६. त्रयस्थ तांत्रिक परीक्षणासाठी नेमावयाच्या पडताळणी यंत्रणांच्या सेवेची व्याप्ती :**

१. ग्रामीण पाणी पुरवठा योजनांचे त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करण्यासाठी नेमण्यात आलेल्या / यावयाच्या यंत्रणांनी त्रयस्थ तांत्रिक परीक्षणाची पध्दती विकसित करावी, ज्यामध्ये नमुना योजना, माहितीचा स्त्रोत, माहिती गोळा करण्याची साधने, क्षेत्रीय प्रक्रिया व गुणवत्ता नियंत्रण रेखाकृती यांचा समावेश असेल.

२. योजनेच्या तांत्रिक तसेच भौतिक प्रगतीचे पुनरावलोकन करावे व आवश्यकता असल्यास सुधारणा सुचवाव्यात.

३. पाणी पुरवठा योजनेच्या साध्य केलेल्या उद्देशपुर्ती/प्रतिपुर्ती निर्देशकांची पडताळणी करावी.

४. पडताळणी अहवाल तात्काळ मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद व आवश्यकता वाटल्यास शासनास (पाणी पुरवठा व स्वच्छता विभागास) सादर करावा.

५. महाराष्ट्र शासन आणि अंमलबजावणी यंत्रणा यांच्यात ठरलेल्या सुत्राप्रमाणे व प्रचलित शासन निर्णयांप्रमाणे वितरीत करण्यात आलेल्या निधीची व कामाची पडताळणी करावी.

६. संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने पुरविलेल्या प्राथमिक माहिती आणि पुराव्याची ऑन-साईट तपासणी आणि पडताळणी करावी.
७. जर एकापेक्षा अधिक कामे असतील तर याद्दश्चिकपणे (Randomly) ५ टक्के पेक्षा कमी नसतील इतक्या कामांना भेट देवून पुरविण्यात आलेल्या माहिती आणि पुराव्याची अचुकता तपासावी/पडताळणी करावी.
८. जेथे आवश्यक असेल तेथे लाभार्थी आणि अंमलबजावणी यंत्रणा किंवा इतर संबंधित यांच्यात मुलाखती व चर्चा आयोजित कराव्यात.

## ७. त्रयस्थ तांत्रिक परीक्षणाकरीता नेमावयाच्या पडताळणी यंत्रणांच्या निवडीसाठी अनुभव:

१. निवड करावयाच्या संस्थाना भारतातील ग्रामीण पेयजल व स्वच्छता क्षेत्राचे ज्ञान असावे.
२. या संस्थांच्या निवडीकरिता त्यांना पाणी पुरवठा व स्वच्छता क्षेत्रातील किमान १० वर्षांचा अनुभव असणे आवश्यक आहे.
३. Mechanical/Electronic/Civil तसेच आय.टी. क्षेत्रातील विविध महत्वाच्या माहितीचे संकलन व हाताळणीचा अनुभव असावा.
४. ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या तांत्रिक व भौतिक तपासणीसाठी तांत्रिक तज्ञाचे संघ गठित करण्यासाठी त्रयस्थ यंत्रणा सक्षम असावी.
५. पाणी पुरवठा प्रणाली आणि /किंवा वितरण प्रणाली यांच्या तांत्रिक लेखा परीक्षणाचा किमान ५ वर्षाचा अनुभव असावा.
६. महाराष्ट्रातील पाणी पुरवठा व स्वच्छता क्षेत्राशी संबंधित तांत्रिक मानके, कायदे व शासन निर्णय यांचे संपुर्ण ज्ञान असावे.
७. त्रयस्थ तांत्रिक परीक्षणासाठी नेमलेल्या संघातील (Team) सदस्यांमध्ये ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता क्षेत्रातील प्रदीर्घ / व्यापक ज्ञान असावे, तसेच या संघात संस्थात्मक विकासतज्ञ यांचाही समावेश असावा.
८. त्रयस्थ तांत्रिक परीक्षणासाठी नेमलेल्या संघात (Team) किमान १० सदस्यांचा समावेश असावा.
९. त्रयस्थ यंत्रणेतील सदस्यांनी पडताळणी अत्यावश्यक/ अनिवार्य असल्याची विनंती/सुचना प्राप्त होताच त्वरीत हजर झाले पाहिजे.

## ८. त्रयस्थ तांत्रिक परीक्षणासाठी पडताळणी यंत्रणा नेमणुकीच्या अटी:

१. जिल्हा परिषदेतील ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या त्रयस्थ तांत्रिक परीक्षणासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी त्यांच्या जिल्ह्याकरिता शासकीय पडताळणी यंत्रणांशी सल्लामसलत करून यादी तयार करावी व त्यास शासनाची मान्यता घेऊन ती प्रसिद्ध करावी.

२. जिल्हा परिषद व त्रयस्थ यंत्रणा /संस्था यांच्यामध्ये ३ (तीन) वर्षाच्या कालावधीकरीता करार करण्यात यावा. या संस्थांची कामगिरी समाधानकारक असल्यास हा करार प्रत्येकी १ (एक) वर्षाच्या कालावधीसाठी याप्रमाणे तीनवेळा वाढविण्याचे अधिकार मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना राहतील.

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद हे सुचना करतील त्याप्रमाणे त्रयस्थ यंत्रणेने आपल्या कामकाजास सुरुवात केली पाहिजे. तसेच विहित मुदतीत तांत्रिक परीक्षणाचे काम पुर्ण केले पाहिजे.

## ९. त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करणाऱ्या पडताळणी यंत्रणांना अदा करावयाचे शुल्क :

त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करणाऱ्या यंत्रणांना त्यांच्या संपूर्ण कामासाठी खालीलप्रमाणे ठोक स्वरूपात शुल्क अदा करण्यात येईल.

| | | |
|---|---|---|
| **१. रु. २.०० कोटी पर्यंतच्या ग्रामीण पाणी पुरवठा योजना** | - | **रु. ५.०० लक्ष** |
| **२. रु. २.०० कोटी ते रु.७.५० कोटी पर्यंतच्या योजना** | - | **रु. १०.०० लक्ष** |
| **३. रु. ७.५० कोटीहून अधिक किंमतीच्या योजना** | - | **रु. १५.०० लक्ष** |

हा खर्च योजनांच्या प्रकल्प अहवालामध्ये समाविष्ट केलेला नसावा. ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या त्रयस्थ तांत्रिक परीक्षणाचा खर्च हा जिल्हा परिषदेकडे उपलब्ध असलेल्या ४ टक्के प्रशासकीय निधीमधून भागविण्यात यावा.

## १०. त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करणाऱ्या पडताळणी यंत्रणांवरील संनियंत्रण :

१. त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करणाऱ्या यंत्रणा/ संस्था त्यांचे सर्व कामकाज मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद व प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांच्या पर्यवेक्षणाखाली व नियंत्रणाखाली पार पाडतील.

२. नियमित पडताळणी/तपासणी प्रक्रियेचे व्यवस्थापन व संनियंत्रण मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या अध्यक्षतेखालील कक्षामार्फत केले जाईल.

३. पडताळणी अहवाल त्रयस्थ यंत्रणेद्वारे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद व आवश्यकतेप्रमाणे प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांना सादर केला जाईल.

४. पडताळणी/तपासणी अहवाल हा अचुक, वेळेवर व वस्तुनिष्ठ पुराव्यावर आधारीत असल्याची हमी त्रयस्थ यंत्रणेने देणे अनिवार्य आहे.

५. शासनास आवश्यक वाटत असल्यास त्रयस्थ यंत्रणेला सादरीकरण करावे लागेल तसेच पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी उपस्थित केलेल्या प्रश्नांचे स्पष्टीकरण त्रयस्थ यंत्रणेला द्यावे लागेल.

६. पाणी पुरवठा योजनांची पडताळणी करण्यासाठी/त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करण्यासाठी आवश्यक असलेली योजनेची माहिती व कागदपत्रे त्रयस्थ यंत्रणेला पुरविण्याची जबाबदारी अंमलबजावणी यंत्रणांची राहील.

७. त्रयस्थ यंत्रणेचे कर्मचारी आणि सल्लागार यांना तपासणी करावयाच्या योजना/प्रकल्प स्थळांना प्रवेश मिळवून देण्याची व्यवस्था करण्याची जबाबदारी अंमलबजावणी यंत्रणांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201506151500549528 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shantaram S Kudale

Digitally signed by Shantaram S Kudale
DN: CN = Shantaram S Kudale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.06.15 15:33:24 +05'30'

**(शां.सि.कुदळे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ००३२
२. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
३. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
४. मा.मंत्री (सर्व), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५. मा.राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
६. सर्व सन्माननीय विधिमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई-४०० ०२१.
७. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव मंत्रालयीन विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
९. विभागीय आयुक्त (सर्व),
१०. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
११. मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व), जिल्हा परिषद.
१२. संचालक, समाज कल्याण संचालनालय, पुणे.

१३. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था, बेलापूर, नवी मुंबई.

१४. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)

१५. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)

१६. मुख्य अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.

१७. अधीक्षक अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण

१८. कार्यकारी अभियंता (सर्व), ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)

१९. मंत्रालयीन इतर सर्व विभाग व त्यांच्या अधिनस्त असलेली सर्व कार्यालये

२०. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने.

२१. सर्व शासकीय आय.आय.टी.संस्था (पत्राने)

२२. सर्व शासकीय अभियांत्रिकी (पदविका/पदवी) महाविद्यालये (पत्राने)

२३. निवडनस्ती, कार्यासन पापु-०७.